# प्रेमदर्शन नाटक.

हें पुस्तक
नाटककार मंडळीच्या उपयोगाकरितां
वसंतराव हरिश्चंद्र कोठारे
यांनीं तयार केलें.

श्लोक.

मना उद्विग्नातें क्षणभरि तरी तोषकरसा ॥
अपाचेनीं योगें हृदयिं उठतो सद्गुण ठसा ॥
रसामध्यें स्वादु अमृतरस त्याहूनि सरसा ॥
गुणी तेची प्रीती अनुपम अशा नाटकरसा ॥

मुंबईंत "इंडियन प्रिंटिंग प्रेस" छापखान्यांत छापिलें.

सन १८८४ इसवी.

# सूचना.

---

हल्लीं पाश्चिमात्य लोकांचें राज्य झाल्यापासून यांत्रिक साधनानें प्रत्येकाचे मनोदय प्रसिद्ध होण्यास उत्तेजन आल्यामुळें माझ्या अल्पमतीनें मोठेंच धाडस करून रंगभूमीवर प्रयोग करण्यास स्वकपोलकल्पित, "प्रेमदर्शन" नाटक तयार केलें. त्याचे प्रयोग मुंबईंत व इतर ठिकाणीं नाटककारांनीं केले व करीत असतात. परंतु सांप्रत विद्याहीन दुर्व्यसनी लोकांचा भरणा नाटकमंडळींत विशेष आढळतो, त्यामुळें ते स्वदेशवात्सल्य बंधुप्रीति हीं संपादन करण्यास शक्तिमान न होतां निंदेस मात्र पात्र होतात, असें जाणून आर्यबंधूंनीं वरीच पुस्तकें प्रसिद्ध केलीं व करण्याचा क्रम सुरू आहे. तोच हेतु मनांत धरून आर्यजनांच्या मनरंजनासाठीं यथामती यत्न करून हें वरील 'प्रेमदर्शन' नांवाचें पुस्तक तयार केलें आहे. रसिकजन आपल्या उदार अंतःकरणांत दोषांस जागा न देतां गुणलेशाचा स्वीकार करतील अशी आशा आहे.

पुस्तककर्ता.

---

तीर्थरूप रा० हरिश्चंद्र शामराव कोठारे

ऊर्फ

तात्यासाहेब

मुंबई हायकोर्टाचे ट्रान्स्लेटर व इंटरप्रिटर

यांस

हें पुस्तक

पितृभक्तिपुरस्सर अर्पण केलें आहे.

वसंतराव हरिश्चंद्र कोठारे,

पुस्तककर्ता.

## आभार.

विद्याभिज्ञ—

शेट ऑनरेबल सर मंगळदास नथूभाई, के. टी. सी. एस. आर. पी.

माजी प्रेसिडेन्सी थर्ड माजिस्ट्रेट रा. ब. नाना मोरोजी.

रा. रा. जनार्दन गोपाळ, सॉलिसिटर, हायकोर्ट.

रा. रा. बाळकृष्ण वासुदेव कीर्तिकर, सॉलिसिटर, हायकोर्ट.

इत्यादि आश्रयदात्यांनीं आश्रय दिल्यामुळें मी त्यांचा फार आभारी आहें.

पुस्तककर्त्ता.

# प्रस्तावना.

---

**श्लोक.**

अविरोधितया कर्म ना विद्या विनिवर्तयेत् ॥
विद्याविद्यां निहंत्येव तेजस्तिमिरसंघवत् ॥

स्वातंत्र्य, ऐहिक व पारमार्थिक सुख, व त्या सुखापासून परीणत झालेली चिरकाल शांति, सदसत् ज्ञान उत्पत्ति व तज्जन्य सताचेठायीं लोलुपता, असताचे ठायीं अलिप्तता स्वसंभव कारण ज्ञान, तेणेंकरून स्वस्वरूप विस्मृतिजनित पंचविषय तीव्र तन्मयता, स्वकल्पित मिथ्याभास वियोग अहर्निश चिंता त्यांचें निरसन व विनिमय होऊन जगांत कृतकृत्य व धन्य करणारी, जी स्वयंप्रकाश विद्या ती प्राप्त करून घेणें हीच मनुष्यजन्मास येण्याची सार्थकता आहे. केवळ क्षणिक दृश्य व भासमान विषयांची अति सूक्ष्मतेनें अमोलिक स्वायुष खर्च करून अट्टाहासानें चिचका चिचक करून जड निदानत्व ज्ञान प्राप्त करून घेणें, व तेणेंकरून सर्वज्ञता व मोठेपणा मानणें, एवढेंच नाहीं तर मदांध होऊन दुर्निवार अभिमान धरणें, दांभिकपणा तीव्र पंचविषय तन्मयता असून; बाह्य मात्र शांतिदर्शन, हे दुर्गुण जिच्या योगानें प्राप्त होऊन आमच्या अनुभवशून्य व असंख्यात पढतमूर्ख विद्वानांस अंतीं हीनत्व देणारी व तळमळ उत्पन्न करणारी,

फक्त क्षणिक तुच्छ व भासमान विषयापासून सुख मिळवून देणारी जी व्यावहारिक विद्या तिचेंच सर्वकाळ अध्यायन करणें हा गौण पक्ष आहे; तथापि विद्येचें प्रथम स्थूल दर्शन झाल्याशिवाय तिचें सूक्ष्म दर्शन होऊं शकत नाहीं, हें मनांत आणून फक्त व्यावहारिक विद्या महत्व सूचनार्थ आजपर्यंत झालेल्या अनेक पुस्तकांप्रमाणें मीहि अल्प मतीनें तयार करून जनमनरंजनार्थ हें प्रेमदर्शन नाटक छापून प्रसिद्ध केलें आहे.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३ | ७ | ईश्वरानीं | ईश्वरानें |
| ,, | १५ | गंधर्व | गर्दभ |
| ६ | २६ | तझे | तुझें |
| १४ | ११ | सत्य०— | रास०— |
| ,, | २४ | रत | तर |
| २६ | ६ | प्रतिपालक | प्रीतिपालक |
| ,, | २४ | परनी | परानी |
| ३१ | १७ | त्यांनीं | त्यानें |
| ,, | २० | चिटोरें | चिटोरीं |
| ३७ | १८ | निमीत्यानीं | निमीत्यानें |
| ४२ | ३ | पडणार | घडणार |
| ,, | १० | मागणारा | वागणार |
| ४४ | ६ | करतेस | करतोस |
| ४७ | २६ | जाग | जागा |
| ४८ | ४ | स्तब्द | स्तब्ध |
| ५२ | १८ | तेज्याला | तेमाला |
| ५५ | ११ | लेहेर | लहर |
| ५६ | १६ | उघशील | उघडशील |
| ६० | २६ | घोंक्यावर | घोड्यावर |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| ६९ | १३ | ( न्यापधिश ) | ( न्या[illegible]धिश ) |
| ७१ | २५ | स्तब्द | स्तब्ध |
| ७२ | २३ | हातानीं | हातानें |
| ९० | ४ | स्वदस्तुचा | स्वदस्तुरचा |
| ” | ४ | रकानीं | रकानें |
| ९३ | १२ | रामज्ञा | राजाज्ञा |

# प्रेमदर्शन नाटक.

रंगस्थळ.

## मंगलाचरण.

पद. (राग-खमाज, ताल धुमाळी).

हे जगदंबे आदिभवानी । महिषमर्दिनी तुज स्तवु-
नी ॥ अनन्यभावें दीन दास हा । विनम्र अंबे तव-
चरणीं ॥ धु० ॥ आद्यशक्ति तूं चराचरांची । भक्त-
जनांची प्रियजननी ॥ प्रणतवत्सले, अगम अगो-
चर । असशी तूं ह्या त्रिभुवनीं ॥ हे० ॥ असती लो-
लुप मुमुक्षु अलिसम । तुझ्या चरितामृतपानीं ॥
अति दुस्तर हा भवाब्धी तरण्या । होसि भवानी तूं
तरणी ॥ हे० ॥ मंगल करिशिल इच्छित कार्यी ।
दृढ निश्चय हा धरुनि मनीं ॥ हरिश्चंद्र सुत वसं-
त हा तव । पूजन करितो वाक्सुमनीं ॥ हे० ॥

सूत्रधार—(नांदी झाल्यावर व पुढें उडवीत बाहेर येऊन) प्रिये, व-
स्त्रालंकारांनीं युक्त असल्यास अम्मळ एथें ये.

नटी—आज्ञा प्राणनाथ. पण-(रंगभूमीवर गीत म्हणत प्रवेश करते.)

ठुंबरी (राग—खमाज, ताल पंजाबी ठेका)

चतुर पंडित असुनि प्रियकरा । कांहो प्रपंचीं ल-
क्ष न आपुलें ॥ धु० ॥ काव्य नाटकीं कसें सदोदित
मन सर्वस्वीं तुमचें रमलें ॥ च० ॥ संसाराची का-

य अवस्था । होइल प्राणसख्या हें नकळे ॥ चतु० ॥ चिंतानल मज जाळि निशिदिनीं । वाटे, दुःखा- व्धित मी पडलें ॥ चतु० ॥ २ ॥

सूत्र०–असें जरी आहे, तरी या महाजनांना सुप्रसन्न करण्यास परवां केलेल्या प्रेमदर्शन नाटकाचा प्रयोग करून रिझवूं !

नटी–आपल्याला नाटक दिसतें; पण माझ्या धनपा- ळाला किती दुःख होतें याचा कांहीं विचार आहे का?

सूत्र०–प्रिये, जगांत सुखी कोणीही नाहीं. हें पहा, (सभाजनाकडे हात करून) महा ज्ञाते कसे तटस्थ होऊन प्र- योगाची इच्छा दर्शवितात; ती अल्पमतीनें पूर्ण करण्यास तुला आज्ञा केली आहे, तर पात्रांची सिद्धता कर म्हणजे झालें.

नटी–आज्ञा प्राणनाथ. मी पात्रांची सिद्धता करितें. (निघून जाते.)

सूत्र०–धन्य मी कीं मला ही सर्वगुणसंपन्न स्त्री मि- ळाली! आणखी तें विशेष काय पाहिजे? एकच पुत्र; परंतु तो मात्र रासगुप्तासारखा न होतो म्हणजे झालें.

रासगुप्त–(पडद्यांतून) अरे भारता, माझी निंदा करतोस काय? मी कोण आहें हें तूं जाणत नाहींस?

सूत्रधार–अरे नांव घेण्याचा उशीर; हा बेटा मजवर रागावला! आतां येथें उभें राहून उपयोगीं नाहीं. (निघून जातो.)

रास०–(पडद्या बाहेर येऊन) सभ्या, अरे मी सर्वगुण- संपन्न असून चंद्रच काय तो माझ्यासारखा देखणा, त्या- वांचून दुसरा कोणी आहे काय!

**संभ्या**–(आपल्याशीं) ग्रहण लागल्यासारखा चेहरा आणि चंद्राची उपमा घेतो! काय आश्चर्य! (उघड) खरें आहे महाराज. आपल्यावरून तर कोटि चंद्र ओंवाळून टाकावेत.

**रास०**–धन्य मी, कीं आज नंदी बैलासारखा वस्त्रालंकारांनीं शोभतों! कां खरें आहे कीं नाहीं?

**संभ्या**–(आपल्याशीं) आतां मात्र योग्य उपमा घेतली. कारण, ईश्वरानीं एक पुच्छ आणि शिंगेंच काय तीं कमी केलीं, बाकी सर्व बरोबर आहे. (उघड) महाराज, सर्व देवांत महादेव श्रेष्ठ; परंतु त्याच्या दर्शनापूर्वी सर्व जन नंदीचें दर्शन घेतात, त्यावरून निःसंशय आपण नंदी आहांत.

**रास०** अरे संभ्या, इतकेंच नाहीं; तर उत्तम भक्षभोज्यांनीं माझा स्वर तयार झाल्यामुळें पशुपक्षांस त्रास होऊन ते माझा हेवा करतात; तर माझ्यासारखा सुंदर स्वराचा या जगांत दुसरा कोणी आढळेल काय?

**संभ्या**–(आपल्याशीं) राजश्रीचा स्वर ऐकून, गंधर्व सुद्धां त्रासेल; मग मनुष्याची काय कथा? (उघड) नाहीं महाराज, जगा व्यतिरिक्त आपला स्वर. मग ते लज्जित होतील यांत नवल तें काय?

**रास०**–खरें बोललास; परंतु विद्यालयांत माझ्या येण्यानें वर्गबंधूंच्या ठायीं अनुराग उत्पन्न होतोना?

**संभ्या**–(आपल्याशीं) अनुराग कसचा उत्पन्न होतो, राग उत्पन्न होत असेल यांत मात्र संशय नाहीं. (उघड) होय महाराज, गुरुजींसही अनुराग होतो. मग त्यांस कसा होत नसेल?

**रास०**–तर चल जलदी. शाळेच्या सुटीचा वेळ झाला.

नित्य नियमाप्रमाणें हजेरीपटांत नांव पडून गुरूस अनु-
राग होईल.

संध्या-(आत्मगतीं) गुरूचा राग होईल या गोष्टीची
लज्जा सोडल्यास महाराज विजयी आहेतच. (उघड) होय
महाराज, उशीर बराच झाला; चला.

रास०-अरे उशीर रे कसचा झाला? विद्याभ्यासाच्या नि-
मित्यानें शाळेचें दर्शन घेऊन येऊं चल. (उभयतां निघून जातात.)

---

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

#### विद्यालय.

नाटकांतील पात्रें:-(सुदेव-गुरुजी.) धनपाळ- (साव-
कारपुत्र.) रासगुप्त-(राजघराण्यांतील मुलगा.) सत्यसेन-
(प्रधानपुत्र.) शारंगप्रभा-(राजकन्या.) व कांहीं मुलें.(शाळें-
तील छात्रपट वर जातांच मुलांची हजेरी घेतल्या नंतर)-

सुदेव-धनपाळा, या मुलांचे पाठ घे; इतक्यांत मी
जाऊन येतों.

धन०-(नम्रतेनें) आज्ञा गुरूजी. (गुरु निघून जातात व आा-
प मुलांचे पाठ घेऊं लागतो) सत्यसेना, तुला गुरूजींनीं न्याय-
शास्त्राचा तिसरा अध्याय पाठ करण्यास दिला असून तो तूं
पाठ केला नाहींस काय?

सत्य०-धनपाळा, तो अवघड असल्यामुळें मला पाठ
झाला नाहीं, त्याला मी तरी काय करावें?

धन०-अशी गोष्ट होईल तरी कशी ! कारण, थोरांची

ह्मण आहे कीं "करील त्याची विद्या." तुझ्या बोलण्यानें या ह्मणीस कांहीं नाहीं का येणार?

सत्य०–तर मग मी काय खोटें सांगतों?

धन०–तुझ्या नांवासारखें सत्य भाषण केल्यास शोभलें असतें; परंतु चोरांच्या सहवासामुळें हळू हळू बराच लोकनिंदेस पात्र झालास. आतां तरी कांहीं दिवस हा सहवास सोड, आणि बाळपण आहे तों विद्या ग्रहण कर. कारण, तूं आईबापांचा एकुलता एक पुत्र. त्यांतून आपला सर्व वेळ द्रव्याचा व्यय करून ऐषआरामांत घालविणें, त्यापेक्षां विद्येसारखें धन संचय करून ठेविलें असतां तें जरी कितीही खर्च केलें, तरी संपणार नाहीं; व जगांत कीर्ति होईल. तर जें साधन साध्य केल्यानें इहलोकीं व परलोकीं भूषणास्पद होईल, ती गोष्ट आपण स्वीकारावी व आळस टाकून विद्याधन मिळविण्याचा यत्न करावा.

सत्य०–होय, हा सर्व उपदेश गुरूजी नित्य सांगतात, परंतु विद्या शिकून आह्मांला काय करावयाचें आहे? आमचीं हत्यारें सतेज असलीं आणि अन्नदात्यास ईश्वरानें दीर्घायुषी ठेविलें ह्मणजे आह्मांला काय कमी आहे?

धन०– अरे, हेंच तें अज्ञानत्व. अन्नदात्याचें रक्षण ईश्वरानें आपणा मानवी प्राण्यांच्याच हातीं दिलें आहे, हें तुला समजण्यास विद्येवांचून दुसरें साधन नाहीं, ह्मणून विद्या ग्रहण कर, नंतर समजेल.

सत्य०–तर काय, मला विद्या येत नाहीं?

धन०–येत नाहीं कशी? येती; परंतु लहान रोप्याचा जसा मोठा घनदाट वृक्ष होऊन फलपुष्पांनीं सुशोभित दिसतो, तसा तूं व्यवहारांत जाणता होऊन विद्येपासून चा-

तुर्यासारखीं पुष्पें व कीर्तिसारखीं फळें घेऊन तुला अद्यापि वरीच खटपट केली पाहिजे. म्हणून ती कर म्हणजे नांवा-सारखा जगांत मान्य होशील. कां शारंगप्रभे, तुझा धडा पाठ झाला ?

शारं०—( मान खालीं घालून मर्यादेनें ) धनपाळा, काल-च्या दिवशीं कांहीं सरदारांच्या मुली आल्या होत्या, त्यांज-बरोबर बोलण्यांत वेळ केव्हांच गेला तो समजला सुद्धां नाहीं. बरें न बोलावें तर राजाच्या मुली कोणाबरोबर बो-लत देखील नाहींत, या अपवादास भिऊन त्यांच्याशीं बोलत बसलें; म्हणून माझा धडा पाठ झाला नाहीं.

धन०—हें एक निमित्यच झालें. असो; आम्हांला काय ?

शारं०—( धनपाळाची खिन्न मुद्रा पाहून ) तूं ही गोष्ट गुरू-जींस सांगूं नकोस, नाहीं तर ते मजवर रागावतील.

धन०—रागावतील हें जर समजतें, तर धडा कां पाठ केला नाहीं !

शारं०—तूं जर मला धडा समजावून देशील, तर गु-रूजींस आतां धडा पाठ करून देतें.

धन०—गुरूजींनीं मला धडे घेण्यास सांगितलें, त्याप्र-माणें अनुक्रमें मीं धडे घेतले, व ज्यांचे ते पाठ झाले नाहींत, त्यांचीं नांवें गुरूजींस सांगितलीं पाहिजेत. असें जर न क-रीन, तर मी गुरूची आज्ञा मोडली असें होईल.

शारं०—तुझ्यापुढें कोणी बोलावें ! पण मी तर तुला प्रे-मानें सांगतें कीं, इतकी गोष्ट तूं गुरूजींस सांगूं नको बर का.

धन०—( सौंदर्यास मोहून )तूं मजबरोबर प्रेमानें वागतीसना?

शारं०—हें काय तझे विचारणें ?

धन०–( किंचित् रागावलीसें पाहून ) आपणच ह्मणालांत, ह्मणून मी विचारतें.

शारं०-धनपाळा, माझें प्रेम तुझ्यावर किती आहे हें तूं जाणत असून आज असें कां बरें बोललास ?

धन०–शारंगप्रभे, एकमेकांवर प्रेम ठेवणें हें मानवी प्राण्यांस मोठेंच भूषण आहे, व तो गुण तुझ्या आंगीं असावा असें पाहाण्याची योग्य संधी पाहून तुजजवळ मागणें आहे. जर देशील, तर—

शारं०–तुला काय पाहिजे ?

धन०–श्रीमंतावर विश्वास ठेऊं नये. कारण, आपण सत्ताधीश, द्रव्यवान, आणि राजकुळांतल्या अशा असल्यामुळें सर्वांना भिऊन वागणें भाग पडतें; मग माझी गरीबाची काय स्थिति ?

शारं०– स्थिति ती कसली ? हें बाई मला मोठें नवलच वाटतें. गुरूजींनीं जी आज्ञा केली, त्यासारखें वागलेंच पाहिजे ह्मणून जेव्हां तेव्हां तुझ्या तोंडून ऐकतें व पुष्कळ पुस्तकांतही अशा उपदेशाच्या गोष्टी वाचतें. तर त्या गोष्टी सांगण्यास द्रव्यवान्, थोर जाणून त्यांना भिऊन का वागावें ?

धन०–शारंगप्रभे, गुरूजींची आज्ञा अथवा उपदेशाच्या गोष्टी सांगण्यास जरी भिऊं नये, तरी कार्याकरितां सर्वांनीं थोरांस भिऊन वागणें भाग पडतें, ह्मणून सांगतों.

शारं०– तुझ्याबरोबर बोलण्यास मी पुरी का पडणार आहें ?

धन०–आपण विचारानेंच बोललांतना !

शारं.-मी कांहीं अविचारी नाहीं ! आतां कां बोलत नाहींस ?

धन०—( आपल्याच मनाशीं ) किती अधीर व चंचल मन हें? अरे तुझी इच्छा व्यर्थ आहे. अलभ्य वस्तूची इच्छा धरून, जगांतून नाहींसा होण्यास कां प्रवृत्त होतोस?—हिला गूढ अर्थांनीं प्रसन्न करण्यास, मना, तुला कांहींच भीति वाटत नाहीं ना? ( उघड सुस्कारा टाकतो. )

शारं०—धनपाळा, नाहीं का बोलत?

धन०—बोलणें ह्मणून इतकेंच कीं, आजपर्यंत जसें आपण प्रेम ठेविलेंत, तसेंच आपलें व माझें जन्मपर्यंत प्रेम असावें हें मागणें आहे, अन्य कांहीं नाहीं.

शारं०—( स्तब्ध राहून विचार करते. तीस पाहून. )

धन०—कां, मागणारांस जें देणें तें देऊन मनोरथ पूर्ण होण्यास किती अवधि आहे?

शारं०—मी का तुह्माला सांगावें? आपण जाणते आहांत.

धन०—( मनांत ) ही सत्य भाषण करणारी, कुलशीलाचा भाव इच्या अंतःकरणावर उमटलेला, ही आपल्या शब्दास खचित बाध येऊं देणार नाहीं असें वाटतें. या उपर ईश्वरेच्छा—( इतक्यांत राजमंदिरांतील रासगुप्त सेवकासह प्रवेश करितो, त्यास पाहून ) या महाराज! आज आपण फार लवकर आलांत!

रास०—[ उद्धटपणानें ] तुला कोणी विचारण्यास सांगितलें नाहीं, गुरूजी ज्यावेळेस मला विचारतील त्यावेळेस त्यांस सांगेन.

धन०—[ शांतपणें ] बरें महाराज, माझ्या बोलण्यापासून जर तुह्माला इतका राग, तर मग पाठांतराचें नांव नकोच घेण्याला. परंतु काय करावें? गुरूंच्या आज्ञेपुढें माझा

उपाय नाहीं ह्मणून विचारतों, क्षमा करा. धडा पाठ झाला कीं नाहीं? . . . .

रास०—धनपाळा, माझा धडा पाठ झाला असता; परंतु सुटी झाल्यावर पुस्तकें घेऊन येसूजी हुजऱ्या आपल्या घरीं गेला, तो अद्यापि आलाच नाहीं. त्याला माझा काय उपाय! तूंच सांग!

धन०—उपाय काय ह्मणून मलाच विचारतां? मला इतकें पक्केपणीं ठाऊक आहे कीं, ज्या मनुष्यांस अंतःकरणापासून विद्या संपादन करणें आहे, त्या मनुष्यांस निमित्यांचें कांहीं कारण लागत नाहीं.

रास०—मी कांहीं खोटें निमित्य सांगत नाहीं. कालच्या येसू हुजऱ्याच्या वर्तणुकेवरून आजचें तुला निमित्य वाटलें त्याला मी तरी काय करावें?

धन०—कालचें राहिलें; परंतु परवांचा तरी पाठ तयार आहे, कीं तोही निमित्यावरच?

रास०—पुस्तकेंच मजजवळ नाहींत; मग धडा तरी होणार कसा? (इतक्यांत सुदेव गुरु येतांच धनपाळ आपल्या जागीं जाऊन बसतो.)

सुदे०—धनपाळा,

धन०—(उभा राहून मर्यादेनें) आज्ञा गुरूजी.

सुदे०—महाराज केव्हां आले?

धन०—रासगुप्त महाराजांची स्वारी आतांच आली.

सु०—हं, (रासगुप्तास) कां महाराज, आपण राजघराण्यांत उत्पन्न होऊन विद्याहीन? पुढें आपलें कसें होईल? कारण, कांतिवर्म राजे आपल्या अभ्यासासाठीं अनेक प्रयत्न करितात, ते सर्व व्यर्थ आहेत. वेळच्यावेळेस अभ्यासा-

स बसणें ह्मटलें ह्मणजे कपाळचें पित्त खवळून जातें. आज आपलें बावीस चोवीस वर्षांचें वय झालें, अद्यापि जर आपणास समजत नाहीं, तर पुढें राज्यकारभार पाहाणार तरी कसे? (मनास विचार करून) मला तरी काय पंचाईत? "करील त्याची विद्या." बरें असो. [धनपालास] धनपाळा, नित्यनियमाप्रमाणें कवितेचा वेळ झाला; आरंभ कर.

धनपाल ह्मणतो-श्लोक (शा. वि.)

प्राणी, आप्त कनिष्ठ श्रेष्ठ जन जे, त्यातें सदा सम्मतें ॥
वर्ते; उद्यम, स्वात्म सेवकपणा, स्वातंत्र्य धारिष्ट तें, ॥
यातें पोसुन, लक्षपूर्वक करी विस्तीर्ण आलोचना, ॥
संपादी, पटुयुक्तिसूचनलता, संकोचता सज्जना ॥ १ ॥

सत्यसेन- श्लोक (शा. वि.)

घे घे सभ्यपणा, सुयुक्त अशना, आरोग्य संवर्द्धना ॥
संतुष्टत्व गुणा, मितव्ययपणा, लोकोपकारी मना, ॥
अक्रोधादिक शांति हीच सुमना, भोगीं क्षमासद्गुना, ॥
सौम्यत्वादिक भूषणा धरि रमे, या सद्गुणांच्या वना ॥ २॥

रासगुप्त- श्लोक-(शार्दूलविक्रीडित)

विद्या नीति कला विहीन असुनी, सौजन्य आंगीं नसे ॥
ज्याची ज्ञान विचारशून्यहि मती, दुर्बोध चित्तीं वसे ॥
ऐशा मूढ नरास सुज्ञ जन ते, देती बहू दूषणें ॥
मानूनी पशुतुल्य सर्व हंसती, भूभार त्याचें जिणें ॥ ३ ॥

शारंगप्रभा— श्लोक.

जें सत्य तें सेवित नित्य जावें, ॥
महात्मता, शौर्य गुणास घ्यावें ॥
स्वदेश प्रीतीस मनीं धरावें ॥
नीतिस्थिरें सौख्य दया भजावें. ॥ १ ॥

सुदेव- (आनंदित होऊन) आज मला जो आनंद

झाला तो सांगतां येत नाहीं. विद्यालयांत मुलांचा जो अभ्यास माझ्या पाहाण्यांत आला, असा जर सतत कांहीं दिवस कराल, तर तुमच्या अनुसंगानें या पृथ्वीवर माझें नांव चिरकाल राहील अशी मी आशा करतों. तर माझी आशा पूर्ण करणें तुह्मां विद्यार्थ्यांकडे आहे. बरें असो, आतां सुटीची वेळ झाली; उद्यीक आपआपले पाठ चांगले तयार करून या. (इतक्यांत तास वाजतो. सर्व निघून जातात.)

---

## प्रवेश २ रा.

(स्थळ–राजमार्ग.)

(रासगुप्त–राजघराण्यांतील मुलगा. सत्यसेन–प्रधान–पुत्र–उभयतां मित्र.)

सत्य०-कां, मित्रा रासगुप्ता?

रास०–कां? आज तूं बराच खालीं राहिलास.

सत्य०–रासगुप्ता, खालीं राहिलों यांत नवल नाहीं. कारण, हल्लीं शाळा अगदीं बिघडली आहे. मुलें अभ्यास करतात, त्यांत त्यांना जें येत असेल, तें आपणांस विचारतात आणि आपणांस न आलें किंवा आपण कांहीं त्यांस विचारलें कीं, लागलींच विद्वत्तेच्या बढाया सांगावयाच्या. मग आह्मांला कांहीं येत नाहीं असें बोलून स्तब्ध बसावें, दुसरें करावें काय?

रास०–खरेंच, गुरूजी ह्मणतात, त्यांत तो हिंमतरामाचा पोरगा धनपाळ त्याचा गंभीरपणा व आर्जवशक्ति पाहून गुरूजी तर अगदीं वेडे होऊन जातात, आणि ह्मणतात कीं, धनपाळासारखा एखादा मुलगा राजाला असता तर सार्वभौमत्व मिळवून गुरूची इच्छा पूर्ण केली असती

अशा बढाया सांगतात. त्यामुळें त्यास गर्व चढून तो पाहि-जे त्याला पाहिजे तें बोलतो, आणि मला राग येऊन कसें उत्तर देतो, हें तर तूं जाणतच आहेस.

**सत्य०**–( आपल्या कार्यास उद्देशून) अरे पण आजची गोष्ट समजली काय ?

**रास०**–ती काय बरें ?

**सत्य०**–हे प्रिय मित्रा, तूं जर मला वचन देशील तर ती सांगतों.

**रास०**–वचन रे कशाला पाहिजे? तुझ्यामध्यें आणि माझ्यामध्यें कधींच अंतर पडणार नाहीं. मी हाच विचार करतों, कीं कातिवर्म काकांच्या पश्चात राज्यभिषेक मला होऊन मी राजा, आणि तुझ्या बापाच्या मागें तूं माझा प्रधान, मग पहा तर खरें कीं राज्यामध्यें कशी एकच धामधूम उडवून देतों ती ! अरे, जोंपर्यंत आपण उभयतां जिवंत आहों, तोंपर्यंत आपणांस वाटेल तसें वागण्यास सर्व गोष्टी अनुकूळ आहेत. तूं कांहीं काळजी करूं नकोस. बोल तुला वचन कशास पाहिजे ?

**सत्य०**–बाबा, वचनाचें काम तर पहिलें. तें मिळाल्यावांचून मला सांगतां येणार नाहीं. देत असल्यास दे, नाहीं तर नाहीं ह्मणून सांग, ह्मणजे पुनः विचारणार सुद्धां नाहीं.

**रास०**–( सत्यसेन रागावलासा पाहून ) सत्यसेना, तूं रागावतोस कां? तुला वचन पाहिजे ना? हें घे वचन. (वचन देतो) आतां तर झालें ना ! बोल आतां उघडपणें काय तें.

**सत्य०**–मित्रा, बाबाच्या मागें मी तुझा प्रधान होणार आणि तुला राज्य मिळणार ! तर तुझें माझें जन्मपर्यंत मित्रत्व राहील अशी गोष्ट तुझ्या हातून करवावी. तेणेंकरून

उभयतां एकाच कुटुंबांतील आहोंत असें वाटून परस्पर प्रीति वाढेल. . . .

रास०—तर मग सांग, उशीर कां करतोस ? नाहीं तर मला जाऊं दे.

सत्य०—जातोस तर जा, मी कांहीं ना ह्मणत नाहीं, परंतु कोणतीही गोष्ट करणें झाली, तरी ती विचारानेंच केली पाहिजे. नाहीं तर "घे सुरी कीं घाल उरीं" अशानें कामें कशीं होतील ?

रास०—(रागावून) अरे हो, हो; विचार काय तो तुलाच ठाऊक. आह्मीं मुळींच अविचारी, मग आह्मांस विचार तो कोठला ?

सत्य०—मित्रा, तूं तर नाकावर माशीही बसूं देत नाहींस. अशानें तुझी माझी स्थिति काय होईल हें सांगतां सुद्धां येत नाहीं.

रास०—कां बरें ?

सत्य०—अरे, त्या हिंमतरामाच्या पोराच्या नादीं ती तुझी बहीण पडली आहे.

रास०—काय? (छातीस हात लावून) माझी बहीण ! !

सत्य०—होय, तुझी बहीण, शारंगप्रभा, समजलास ?

रास०—माझी रे बहीण कसली ? तिचें जितकें अनहित होईल, तितकें तर मला फारच प्रिय. मग या गोष्टीपासून मला काय बरें दुःख ?

सत्य०—वाहवारे वा ! हेंच तें अज्ञानत्व. अरे, त्या सावकाराच्या पोराला राजघराण्यांतील मुलगी मिळाल्यानें तो आपलीं पाळें मुळें खणून काढील इतकें तुला कसें कळत नाहीं? गुरूजी त्यास चांगला चांगला ह्मणूं लागल्यापासून

तो नाहीं नाहीं त्या कागाळ्या सांगून आपला हेवा करतो; हें तूं जाणत असून आपला अपमान करून घेतोस हें तुला बरें वाटतें ना?

रास०—सत्यसेना, काय करूं? "जी जलता है लेकिन कुछ चलता नहीं" अशी माझी स्थिति झाली. खरोखर तूं माझा जिवलग प्रिय मित्र आहेस यांत कांहींच संशय नाहीं. (रागानें) अरेरे, त्या सावकाराच्या पोराला पाहिला, कीं सर्वांग तप्त होऊन वाटतें कीं शाब्देंतच त्यास ठार करावा.

सत्य०—शाबास, शाबास; (पाठीवर थोपटून) हेंच काय आपलें शाहणपण?

सत्य०—कां? (त्याच्याकडे पाहूं लागतो.)

सत्य०—मी जें पूर्वी बोललों तेंच अनुभवास आलेंना?

रास०—मित्रा, दुसरा उपाय नाहीं. कारण, गुरूजी प्रीतिपूर्वक त्याचे गुण वाखाणतात, ह्मणून दरबारांतही त्याची प्रशंसा. आतां ह्याला उपाय तरी काय करावा? मला तर कांहीं युक्ति सुचत नाहीं.

सत्य०—युक्तीला काय तोटा? जोंपर्यंत मी तुझ्या जवळ आहें, तोंपर्यंत तुला दुसऱ्याचें साह्य पाहिजे कशाला?

रास०—असें जर आहे, तर एखादी युक्ति तरी सांग पाहूं.

सत्य०—अरे युक्ति ती काय सांगायाची? मी सांगेन, आणि ती करण्यास तूं आळस केल्यास मनांतील हेतु मनांत राहून जातील. याला काय उपाय?

रास०—उपाय ह्मणून काय विचारतोस? उपायाकरितांच रत तुझें मी अनुमोदन घेतों!

सत्य०—असें खरें ना?

रास०—अद्यापि शंका आहे?

सत्य०—नाहीं रे बुवा.

रास०—मग उशीर कां ?

सत्य०—मित्रा, प्रथमतः शारंगप्रभेस बोध करून ती मला वरील असें तिजपासून वचन घे. मग मी सर्व व्यवस्था लावतों.

रास०—(मनन करून) सत्यसेना, मला वाटत नाहीं, कीं ती ही गोष्ट मान्य करील. पुढें पहावें काय होतें तें.

सत्य०— रामगुप्ता, तिला विचारण्यापूर्वींच तूं माझे हात पाय गाळतोस काय? जर तूं माझ्या शौर्याची, रूपाची, व गुणाची प्रशंसा केलीस, तर इंद्राची रंभाही वश होईलः मग शारंगप्रभेची प्रतिष्ठा ती किती ?

रास०— अरे प्रतिष्ठेबद्दल मी बोलत नाहीं. कदाचित् तिनें आपल्या आईबापांस ही गोष्ट सांगितली, तर तिचें बोलणें घरांतील सर्व मनुष्यांस खरें वाटून तीं या गोष्टीबद्दल आपणांस दोषी ठरवितील याचा काय विचार ?

सत्य०— विचार ह्मणून काय विचारतोस ? तिलाच धमकी देऊन सांग, कीं तूं त्या सावकाराच्या पोराच्या नादीं लागली आहेस. मग तुझा मनोदय तिला सांगण्यास कितीसा वेळ लागणार ?

रास०— (आनंदित होऊन) वाहवा ! तूं फार गोड युक्ति सांगितलीस ! या युक्तीनें हां हां ह्मणतां शारंगप्रभा तुझ्या स्वाधीन करीन. परंतु माझें एक तुला सांगणें आहे.

सत्य०— तें काय ?

रास०— तूं आमचें शहर सोडून जाणार नाहींस, आणि तिला दुःख देणार नाहींस असें जर मला वचन देशील,

तर मी लागतों उद्योगाला; नाहीं तर सुखाचा जीव दुःखांत घालतो कोण ?

सत्य०– मित्रा, "बोलेल तो करील काय ?" हें नाहींका तुला समजत ? अहा हा हा ! हें वे वचन आणि लाग उद्योगाला. (तो जाऊं लागतो, मोठ्यानें) मित्रा, वचन दिलेंस त्याचें स्मरण नीट ठेव.

रास०– होय नीट ठेवतों. (दोघेही निघून जातात.)

---

## प्रवेश ३ रा.

### (राजकन्येचा महाल.)

(राजकन्या शारंगप्रभा, गंगी दासी, रासगुप्त, संभ्या खिजमतगार, हिरजी देवडीवरील शिपायी.)

रास०– (मनाशीं) मी वचन तर दिलेंच. पुढला भाग होणें कठीण दिसतो. कारण, कीं ती बुद्धि व चातुर्य यांनीं युक्त आहे. मी जर कांहीं बोललों, तर माझेच कान माझ्या हातांत देण्यास अनमान करणार नाहीं. काय करावें? (फिरूं लागतो) जावेंच. (पुन्हा पहिल्या जागीं येऊन) छे बुवा, नको. (विचार करून) एकदम बरोबर नाहीं. आणि मला जर जाणें आहे, तर चौकशी अशीं जावें. (इतक्यांत संभ्या प्रवेश करितो.)

संभ्या– (मालकाची चमत्कारिक स्थिति पाहून) कुकर्म आणि कुसंगत, यांणीं तर विडाच उचलला आहे. (रासगुप्ताकडे हात करून) अशाची सेवा, हें पूर्वपातकाचें शासन. घात, पात आणि असत्य भाषण, यांनीं तर महाराजांकरितां जन्मच घेतले असतीलसें वाटतें. (इतक्यांत रासगुप्त पाठीमागें पाहून.)

रास०—कोण रे माझ्या विचारामध्यें गडबड करून त्रास देतो? . . . .

संभ्या —(एका बाजूस उभा) अरे हे राजश्री तर जवळच, आणि मीही बरळूं लागलों! (जवळ जाऊन) मी महाराज.

रास०—कोण संभ्या, अरे तूं माझ्या मागें कां?

संभ्या—सरकारची वृत्ति पहाण्यास.

रास०-अरे तूं माझा सेवक असून असें उद्धट भाषण करतोस काय?

संभ्या नाहीं महाराज, काय आज्ञा आहे?

रास०-असा ताळ्यावर येऊन बोल.

संभ्या- बरें आहे; जाऊं ना आतां? (जाऊं लागतो.)

रास०—(हाक मारतो) संभ्या, (तो जवळ येऊन उभा राहतो) देवडीवर कोणी आहे काय? जा पाहून ये.

संभ्या- महाराज, पाहून आल्यावर आपण पुनः कोणास बोलावून आण ह्मणून सांगणार, त्यापेक्षां देवडीवर कांहीं निरोप सांगण्याचा असल्यास सांगा; नाहीं तर आपण चला ह्मणजे झालें.

रास०-अरे आह्मी राजेलोक, आमच्या बरोबर तुह्मां लोकांनीं मोठ्या नम्रतेनें वागलें पाहिजे.

संभ्या- होय महाराज, प्रजेचें पालन होण्यास कारण धन, तें जर राजाजवळ नाहीं, तर तो राजा नाहीं.

रास०- अरे शतमूर्खा, बापाच्या पश्चात मी लहान असल्यामुळें काकास राज्याभिषेक झाला, ह्मणून तूं मला दरिद्री ह्मणतोस काय?

संभ्या- (हळूच) महाराजांचा समजच विलक्षण झाला. कारण, काकासाहेबांस राज्यभिषेक झाल्यानें त्यांनीं

तुह्मांस कांहीं कमी केलें नाहीं. उलटें वंशांत कोणासही पुत्र नसल्यामुळें तुह्मांस विद्वान् व सुशील करून राज्यसूत्रें तुमच्या स्वाधीन करून ते यात्रेस जाण्याचा विचार करितात. परंतु ह्मण आहे कीं "पालथ्या घड्यावर पाणी" असें होतें. तर तसें न होण्याचा यत्न करणें महाराजांकडे आहे.

रास० तर तुझ्या मतें मी काय करावें ?

संभ्या-महाराजांनीं विद्याधन मिळविण्याचा यत्न केल्यास प्रजेचें पालन होईल.

रास०-काय बेटा शाहाणा ! अरे काकांनाच राज्यकारभार पाहतां येतो असें नाहीं; मला राजा होऊं दे मग तूंच ह्मणशील कीं, आतां राजे खरे.

संभ्या-महाराजांस मी खोटें ह्मणत नाहीं.

रास०-तर जा, आणि देवडीवर कोणास तरी सांग कीं, रासगुप्त धाकटे सरकार यांची खुद्द स्वारी येत आहे.

संभ्या-महाराजांनीं मला पाठविण्यापेक्षां स्वतां जाऊन हुकूम केल्यास आपणास विशेष शोभणार आहे. तर तसें वागण्यास सेवक प्रार्थना करतो आहे.

रास०-बरें तर तूं जा. [तो निघून जातो व आपण देवडीवर जाऊन] कोण आहे रे देवडीवर ?

हिरजी-जी, मी सरकार.

रास०-हिरजी, शारंगप्रभेस मी आल्याची वर्दी दे.

[हिरजी शारंगप्रभेस हें वर्तमान सांगण्यास जातो.]

शारं०-गंगे.

गंगी-जी, बायसाब.

शारं०-अग, बाबांनीं मेजावर दोन पुस्तकें ठेवलीं आहेत किनई, तीं घेऊन ये पाहूं. [ती आंत जाऊन दोन पुस्तकें

आणून देने, त्यांतून कांहीं विषय वाचून मनाशीं] ह्या गोष्टीला आणि मला, कांहींच संबंध नसून मला बाबांनीं ज्या अर्थी ती वाचण्यास सांगितली त्यावरून मला वाटतें सत्यास जय आहे. बरं पण, मजपासून दुसरं कांहीं असत्य तर घडलें नाहीं ना? नाहीं तर हीं पुस्तकें बाबांनीं मला वाचायाला देण्याचं कारण तरी काय? (विचार करते) बरं पण मला बाई कांहीं आठवत नाहीं, कीं मी खोटं बोललें अथवा अपराध केला. [पुन्हा स्तब्ध राहते] कदाचित् न जाणून घडलाही असेल. पण आतां मात्र मला फार जपून वागलं पाहिजे; नाहीं तर बाबांचा रागीट स्वभाव, त्यांना केव्हां राग येईल आणि काय बोलतील याचा नेम नाहीं. (इतक्यांत हिरजी येतो.)

हिर०–(दुरून, मोठ्यानें) अग ये, तथ कोन हाइग? अग उमे, ये गंगू, कोनबी ओ देत न्हायी?

गंगु–(घरांतून) अर कोनर त्यो, हिरजीदादा व्हय?

हिर०–व्हय, मी हाय त्यो. बिगीबिगी जाऊनशनी धाकट सरकार आल्याती म्हनुन कळीव कीं. (ती जाऊन शारंगप्रभेस सांगते.)

गंगु–बाईसाब्, दादा वर्दी देत्यात कीं, महाराज आल्याती.

शारं०–(चकित होऊन उभ्यानेंच) बाबांची कां स्वारी येत आहे! (सामोरी जाऊं लागते.)

गंगु–न्हाइ, आपलं धाकट सरकार नव्ह का?

शारं०–काय ग बाई सांगण्याची तऱ्हा ही? पूर्वींच जर बोलतीस, तर इतकी घाबरी कां झालें असतें? (रासगुप्तास पाहून) या, कां आज कोणीकडे मार्ग चुकलांत?

रास०–नाहीं, तुझ्याचकडे आलों.

शारं०–मग उभे कां? बसायला सांगण्यास मानपान द्यावा लागतो वाटतं?

रास०–घरांत मानसन्मान कशाला पाहिजे? हा बसलों. (बसतो.)

शारं०–कां, दादासाहेब, आज आपल्या येण्यानं मला कितीई भारी आनंद झाला! आज वेळ बरा सांपडला!

रास०–ताई, रोजचा मला वेळ आहे; पण तूं झालीस उपवर ह्मणून तुझ्याकडे येणें अयोग्य वाटून येत नव्हतों इतकेंच. दुसरें काय?

शारं०–आज तो विचार मनांतून नाहींसा झाला, ह्मणूनच यायाला फावलं ना?

रास०–(विचार करून) ताई, तूं माझी बहीण आणि मी तुझा भाऊ. तुझी काळजी सर्वांस आहे. परवां कोणसा दरबारांत ह्मणत होता, कीं शारंगप्रभेस हें पंधरावें सोळावें वर्ष लागलें. तेव्हां तिच्या रूपाला, गुणाला, आणि वयाला, शोभेल असा पति पाहिला पाहिजे. तो कसा मिळेल? या विचारांत मला रात्रीं झोप लागत नाहीं! काय करावें!

शारं०–दादासाहेब, माझा जन्म होण्यापूर्वीच ईश्वरानें मजकरितां पति उत्पन्न केला असेल, असा विवेक करून आपण स्वस्थ बसावं, दुसरं काय करणार?

रास०–ताई, आतां तूं मला लाजूं नकोस, तुला कोणता पति पाहिजे?

शारं०–इतक्याच करतां का आपलं येणं झालं दादा!

रास०–होय, याच कामासाठीं आलों. तर वेळ न जाऊं देतां सांग लवकर.

शारं०–दादासाहेब, यांत मला काय समजतं?

**रास०**–(विनोदानें) तूं माझी बया, शाहणी कशी. बोल; तूं मला भिऊं नकोस. कोण तुला पति पाहिजे सांग, (शारंगप्रभा खालीं पाहूं लागते) लाजतीस कां? चटदिशी सांगावें ह्मणजे फट् ह्मणतां तुझें लग्न लावून देईन, समजलीस? कां बोल बया बोल.

**शारं०**–मी बाई कशाला लाजूं? गाई आणि मुली सारख्याच. जिथें बांधाव्या तिथें गाई राहतात आणि मुली ज्या घरीं द्याव्या तिथें आपलें आयुष्य काढतात. मग मला विचार कशाला पाहिजे? वडील आहेत, आई आहे, तुमच्यासारखे भाऊ आहेत, आणखी तें मला काय पाहिजे?

**रास०**–(आनंदित होऊन) आतां कसें खरें बोललीस! (स्तब्ध राहतो.)

**शारं०**–दादासाहेब, कां बोलत नाहीं?

**रास०**–बोलण्यास तर आलों, आणि बोलत नाहीं कसा?

**शारं०**–आपण बोलतां, पण मन मोकळें करून बोलायला भितां.

**रास०**–हा चतुर बाहदर कोणासही भिणार नाहीं, समजलीस? पण तुला मी सांगेन तसें तूं ऐकशील ना?

**शारं०**–आपण मला काय ऐकण्यास सांगतां?

**रास०**–ताई, दुसरें कांहीं नाहीं. तुझ्या रूपगुणाला शोभण्यासारखा मी तुला एक पति पाहिला आहे.

**शारं०**–कोणता बरं?

**रास०**–तुझ्या पाहाण्यांतला आहे. आतां तुला समजला कीं नाहीं?

**शारं०**–दादासाहिब, माझ्या पाहण्यांतला आहे? कोण बरं?

रास०–ताई, आपल्या शाळेंतीलच आहे. तुझ्या लक्षांत येत नाहीं !

शारं०–आपणच नांव सांगा ह्मणजे समजेल.

रास०–आपला प्रधानपुत्र सत्यसेन. तो का वाईट आहे?

शारं०–दादासाहेब, कोणाचं नांव घेतलंत ?

रास०–आपल्या सत्यसेनाचें.

शारं०–आहाहा !! हें बोलणं आपलं आपल्यासच शोभतं. कितीही झालं तरी तो आपला चाकर. बरं कुलशील तरी नांवाजण्यासारखं, तर तेंही नाहीं. विद्याहीन, अशास देणं त्यापेक्षां विहिरींत ढकलून दिलं, तर वाईट का होणार आहे ?

रास०–ताई, तूं असें कां ह्मणतेस ? शाळेंत सर्वांत गुणी, व महाविद्वान्, असा माझ्या पाहाण्यांत दुसरा एकही नाहीं. तो एक सावकाराचा पोरगा धनपाळ त्याची मात्र गुरूजी स्तुति करतात, पण बेल्याच्या अंगीं शूरत्व नाहीं. अशास तुझ्यासारखें रत्न दिल्यानें जग तरी काय ह्मणेल ? ह्याचा विचार आह्मांस आहे कीं नाहीं ?

शारं०–दादासाहेब, आपण थोर आहांत. मी बाई काय सांगावं ? पण धनपाळाच्या गुणाची प्रशंसा उगीच कोणी गात नाहींत. तो स्वतः एखाद्या विषयावर बोलूं लागला ह्मणजे गुरूजीच मान डोलवीतात असं नाहीं, बाबाही त्याचे गुण गातात; ते उगीच का ? त्याची विद्वत्ता पाहून मला तर असं वाटतं, कीं हा माझा स्त्री जन्म व्यर्थ आहे.

रास०–असें वाटण्याचें कारण काय बरें ?

शारं०–दादा, मी जर पुरुष असत्यें तर विद्या शिकून

सार्वजनिक हिताकडे माझ्या सर्व आयुष्याचा खर्च केला असता बरें का.

रास०— सार्वजनिक हिताकडे! हें तुझें बोलणें मी मुळींच समजलों नाहीं.

शारं०—सार्वजनिक हिताकडे, हे जर तूं समजत नाहींस तर मित्राचे गुण आणि रूप कसा समजलास?

रास०— या तुझ्या बोलण्यावरून मला वाटतें कीं माझा मित्र कुरूप, मूर्ख, आणि नीच आहे.

शारं०— मी कशाला बाई बोलूं! तूंच विद्या शिकून अनुभव घे ह्मणजे समजेल.

रास०— (रागानें) ताई, ताई, ह्मणत असतां तूं तर माझ्या डोकीवरच पाय देऊं लागलीस. शारंगप्रभे, तूं अलड आहेस. तूं आपले विचार, शहाणपण, आणि वय हें सर्व व्यर्थ खर्च केलेंस. तो यःकश्चित पोरगा धनपाळ, त्याचें बोलणें तुला आवडून तुला स्त्रियांचा जन्म व्यर्थ वाटला काय? अग मी पुष्कळ दिवस जाणतों कीं तूं त्याच्या नादीं लागली आहेस. परंतु निमित्याकरितां सत्यसेनाचें नांव घेतलें समजलीस! (शारंगप्रभेस खालीं मान घालून बसलेली पाहून तिच्या जवळ जाऊन लाडूकपणानें) माझ्या मनांतून तूं माझी बहीण, तूं व मी एके ठिकाणीं राहून एकमेकांचे उपयोगीं पडावें, परंतु दैवापुढें कोणाचा उपाय नाहीं ह्मणून ही बुद्धि सुचली. यापासून फार अनर्थ होणार समजलीस.

शारं०—हो, मी सर्व समजून आहें. मीही निक्षून सांगतें कीं जें मी बोललें तें सर्व खरें असून आपणांस राग आला तरी "दासापेक्षां सावकार श्रेष्ठ" मला कोणीही दोष देणार नाहीं.

रास०–तर काय, तूं त्या सावकाराच्या पोरास वरणार?

शारं०–आपण तर दादाच आहां, आपल्याला माझ्या बोलण्याचा अर्थ नाहीं का समजला?

रास०–समजला, परंतु तुला आणखीही एकवेळ सांगतों कीं, तूं त्या सावकार पोराचा नाद सोड आणि माझा मित्र सत्यसेन यास माळ घाल, ह्मणजे तुला सर्वस्वी सुख होईल. नाहीं तर दुर्धर दुःखांत पडशील.

शारं०–दादासाहेब, याहीपेक्षां जरी मला धमकी दिलीत, तरी जें मी एकवेळ सांगितलें, त्यांत कांडी इतका फरक पडणार नाहीं. मग तुमच्या उपदेशाचें कारण काय?

रास०–ताई, तुला अनेक प्रकारें बोध करितों, तरी आपला उद्धटपणा न सोडितां कांडी इतका फरक पडणार नाहीं ह्मणून सांगतेस. तर तूंही पक्कें समज कीं, त्या सावकाराच्या पोराचें नखही तुझ्या दृष्टीस पडणार नाहीं अशी काकांना सांगून व्यवस्था करतों. (जाऊं लागतो.)

शारं०–(त्रासून) पुरे बाई, तुझ्यापुढें कितीही बोललं तरी त्याचा तुला विचार होत नाहीं; मग बोलून काय फळ? (तो निघून गेल्यावर विचार करून सुसकारा टाकून) अग बाई, आंग थरथरां कांपूं लागलं, मला सुचेनासं झालं, काय बाई करूं? मेल्याचा विचार, बुद्धि, आणि तर्क कांहीं विलक्षण. अज्ञानें आपला व दुसऱ्याचा नाश होणार. बाबाही याची वागणूक जाणतात. पण बाई हा त्या गोष्टी आईबापांला सांगून मजवरील प्रीति कमी करील आणि जग मला तोंड काढूं देणार नाहीं. (रडते) आतां मी आपला जीव देऊं कीं देश सोडून जाऊं? काय बरें करावें? जर राहिलं, तर उगीच आईबाप गांजतील, जीव जर द्यावा,

तर पुनः पुनः हा जन्म येतो. असेंही नाहीं. हो, बरीच आठवण झाली, आपल्यापेक्षां शाहणा तो धनपाळ आहे. त्याचा विचार या गोष्टीस विचारावा. (मनन करून) पण जग असें ह्मणेल कीं, राजकन्या सावकारपुत्राबरोबर निघून गेली. याला उपाय मला तर कांहीं सुचत नाहीं. (विचार करून) कांहीं होवो. जगांत कोण निर्दोषी आहे? आतां हाच माझा कृतसंकल्प, कीं माझें सर्व आयुष्य कौमार्यव्रतांत घालवायाचं. जनापवादास भिऊन राहिलें, तर माझे हालहाल होऊन जीव जाणार. तर आतां मेलं करूं तरी काय? (विचार करते) हो, हाच बेत बरा कीं, धनपाळ आल्यास आपण देशपर्यटणाला जावें. बरं तो कांहीं अविचारी नाहीं, कीं मजबरोबर येऊन लोकापवाद सहन करील. कदाचित् मी विनंतीपूर्वक जर कांहीं सांगितलं आणि त्यानं ऐकलं तर सांगवत नाहीं. पण माझी त्याची भेट होणार तरी कशी? त्यास पत्र तरी लिहून कळवितें. (इतक्यांत गंगु येते.)

गंगु– (शारंगप्रभेचे डोळे पाण्यानें भरलेले पाहून) बाइसाब, आज आपलं नाक आन् डोळ लाल झाल्याती, आंगांत वाईट करत व्हय?

शारं०– (भानंआ येऊन) छी ग वेडे, तसलं कांहीं नाहीं.

गंगु–(हात जोडून) अन मी आपली बटकूर असूनशेनी मज सांगाया आडेएडे कशापाइ? सांगा मस्नी, ह्मजी मीनी पुगत सांगन.

शारं०–(विवेककरून) कांहीं नाहींग; पण तूं माझं इतकं काम कर, कीं मेजावरून कागद, दौत व लेखणी घेऊन ये.

गंगु–जी बायसाब. (आज्ञेप्रमाणें आणून देते.)

शारं०–राबता बंद ठेव. (कागद मांडीवर घेऊन लिहिते)

( मनाशीं ) काय विशेषण लिहूं बरें ? ( विचार करून ) जे शब्द मनांत येतात ते तर शेंकडोंवेळां पुस्तकांत आढळतात. नवीनच शब्द आणि वाक्यरचनेस जी विद्वत्ता पाहिजे, ती मला अबलेला कोठून येणार ! ( भ्रमित होऊन ) तर आतां लिहूं तरी काय? ( पुनः मनन करून लिहिते ) (पत्र०)—" बंधुवर्ग प्रतिपालक मित्र धनपाळ यांस—कळावें कीं, स्त्री-जन्म व्यर्थ वाटून देशपर्यटणाच्या इच्छेनें आज रात्रौ ९ घटकेस साहाव्या खिडकींत आपली वाट पहात सर्व तयारी निशीं बसतें. मनोदय असल्यास पाठविलेल्या सेवका सोबत कळवून बंधुप्रीति जोडाल अशी आशा धरून लिहिलें आहे. ह्मणून जनापवादाकडे लक्ष न देतां माझ्या मनोदयाप्रमाणें वागणारा अन्य माझ्या आढळण्यांत नसल्यामुळें आपण निष्पाप अंतःकरणानें माझें रक्षण कराल ह्मणून ही विनंती केली आहे. बहुत काय लिहिणें; लोभ असावा. " ( शारंगप्रभा सही करते व ते पत्र बंद करून ) गंगे, जा देवडीवरनू हिरजी असल्यास मी बोलावतें ह्मणून कळीव. ( गंगु हिरजीस बोलावून आणते त्यास ) हिरजी, माझें निकडीचें काम आहे; करशील का ?

हिर०—( नम्रतेनें ) बाईसाब, आपुन तर माझं मायबाप जो हुकूम द्याल त्यो डोईवर घेयाला तय्यार हाय पगा.

शारं०—हें का मी जाणत नाहीं ? पण बाई कोणाजवळ तूं बोललास, तर मग मात्र तुझी माझी धडगत नाहीं ह्मणून विचारतें.

हिर०—( छातीस हात लावून ) ह्यो परनी.

शारं०—नाहीं, तूं बोलणार नाहींस. पण आणखीहीं तुला बजावून सांगतें कीं, ही गोष्ट कोणास न समजतां

सिद्धीस गेली, तर तुला शेला पागोटं देईन समजलास?

हिर०–कायी. हुकूम हायी!

शारं०–हिरजी, जव्हेरी बाजारांत नाक्यावर जो वाडा आहे, त्यांत आमच्या शाळेंतील सावकाराचा मुलगा तो धनपाळ (तो विचार करतो असेसा पाहून) तूं त्याला पाहिला असशील, कानांत चौकडे वगैरे घालतो तो?

हिर०–(ओळखल्यासारखें करून) जी होय, मी जानतो; त्यो हिंमतराम सावकाराचा ल्योक नव्ह का?

शारं०–होय तोच. त्याला हें पत्र (कागद देती) कोणास समजूं न देतां दे, व कांहीं उत्तर दिल्यास मला कळीव बरं. (तो जाऊं लागतो त्यास हाक मारून) हिरजी, पहा बरं, पत्र कोणा दुसऱ्याच्या हातीं लागल्यास तुला मला जीव द्यावा लागणार; म्हणून सांगतें कीं, नीट ओळखून संभाळून हें पत्र त्यांच्या स्वाधीन कर.

हिर०–ठिक हाये बायसाब, जाऊना? (निघून जातो.)

शारं०–(मनाशींच) एक काम तर झालंच. आतां मला माझी व्यवस्था करून बसलं पाहिजे. (पडद्यांत जाते.)

---

## अंक २ रा.

---

### प्रवेश १ ला.

राजपुत्राचा महाल (गच्ची.)

(संभ्या, रासगुप्त, हिरजी जासूद.)

रास०–(शारंगधरानें न ऐकल्यानें संतप्त होऊन घाम आल्या. मुळें गच्चीवर येऊन) संभ्या, पंखा घेऊन ये. जिवाला मुख

नाहीं. (विचार करून) मला वाटतें कीं, सूर्याचे तीव्र किरण पडल्यामुळें इतकी थंडी वाजती; तर तूं पंख्यानें वारा घाल ह्मणजे थंडी न वाजतां उभयतांना गच्चीवरून शहरची गम्मत पाहाण्यास मजा पडेल नाहीं बरें?

संध्या–(एका बाजूस भावल्याशींच) काय बेल्याचा तर्क! मी तर गर्क होऊन गेलों या बोलण्यानें. (जवळ जाऊन) महाराज, सर्व खरें आहे; परंतु शरीरास कष्ट होऊं न देतां महालाचीं सर्व द्वारें बंद करून निद्रा करा ह्मणजे वर्णनीय शोभा दिसून सेवकजनावर उपकार केल्यासारखें होईल.

रास०–अरे तूं हवें तें बरळतोस. उपकार करून काय लोकांची धन करायची? अरे मघां मी त्या शारंगप्रभेकडे गेलों होतों; तिनें माझी अशी टेर उडविली कीं मीही ह्मणलों येरे यं.

संध्या–(हसून) जशी महाराजांची निष्ठा, तसेंच त्याचें फळ.

(इतक्यांत जमेरी बाजाराकडे हिरजीस जातांना पाहून त्याचा पाठलाग करून.)

रास०–(कांहीं अंतरावरून) हिरजी, हिरजी, इकडे ये.

हिर०–(पाचरून) जी सरकार.

रास०–हिरजी, वाड्यांत चल. मला कांहीं काम आहे.

हिर०–सरकार, माझ्या कारभारनीच्या पोटांत लैइ दुखत हाई, ह्मनुन बाईसायबाचा हुकूम घेऊनशेनी घरीं जातोय.

रास०–घरीं मग जा. मला कांहीं काम आहे. चल मजबरोबर. (उभयतां वाड्यांत येतात) या बाहादराला असाच

भिऊन वागत ना, ह्मणजे मला श्रेष्ठ लोक वीरपुरुष ह्मणतील. . . .

हिर०–( सुटका होण्याच्या इच्छेनें ) संमद खर हाइ, पर मला हुकूम मातर द्यावा ह्मजी घरीं जातुय. ( दरवाज्याजवळ जातांच गचांडी देऊन आंत लोटतो. )

रास०–अरे गुलामा, तूं धनपाळास शारंगप्रभा भेटीव-तोस? तो तुझा मित्र आहे. आणि मी राजपुत्र गच्चीवर थंडींत बसलों असतां मला मुजराही केला नाहींस. तुला काय वाटलें? बोल.

हिर०–( धनपाळाचें नांव ऐकल्यावरून थरथरा कांपत ) का, कांईंबि न्हाई.

रास०–तर तूं धांवत न येतां कोठें जात होतास?

हिर०–घरीं, आनीक कुनकडे !

रास०–रखमीस रात्रीं तुला बोलावण्यास सांगितलें; परंतु ती आली नाहीं. तर तूं शिक्षेस पात्र आहेस किंवा नाहीं? बोल लवकर.

हिर०–सरकार, आपुन मास्नी हुकूमच दिला न्हाई.

रास०–( रागानें ) हुकूम दिला नाहीं? हा घे. ( हिरजीस दोन गुद्दे देतो. त्याच्या बगलेंतील शेला खालीं पडतो. तो उचलूं लागतांच धनपाळाच्या नांवाचा लखोटा हातीं घेऊन शेला देऊं लागतो व पत्र वाचून )

रास०– ( मनाशीं ) एक कामच झालें. बरें, हें ( पत्र दाखवून ) तूं कोठून उपटलेंस? खरें सांग; नाहीं तर पाहिलीस, ( तलवार दाखवितो ) हिनें ठार करीन.

हिर०– ( घाबऱ्या घाबऱ्या ) म–म–म–मास्नी ठाव नाइ. पगा मी तु–तु–तुमच्या पाया प–प–पडतो, मला जाऊं द्या.

रास०–अरे, वाड्यांत शेटिंगपाच्छाई आहे. तुला सांगावें

एक व तूं करतोस भलतेंच. [रागानें] अरे हरामखोरा, मला तूं ओळखलें नाहींस ? वाड्यांत मेजवान्या करून त्या सावकारपुत्रास बातम्या पत्रें पोहेंचवून तूं राजा होण्याचा यत्न करतोस हें? बरें आहे, तुला जीवंत ठेऊन उपयोग नाहीं. [तलवारीचा वार करून हिरजीचे कंबरेपासून दोन तुकडे करतो.]

वाड्यांतील सेवक– अरेरे! काय अनर्थ हा! बिचारा प्राणास कीं हो मुकला !

रास०– (रागानें) कोण आहेरे वाड्यांत ! (कोणीच उत्तर देत नाहींत.) मला खून चढला आहे. तुह्मीं हिरजीला वाड्यांतच गाडा आणि कोणी विचारलें तर सांगूं नका. नाहीं तर खाटकी बकऱ्यांचीं शिरें तोडतो, तशीं तुमचीं तोडीन समजलांत ?

सेवक– बरें आहे. (आपल्याशीं) "असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ " अशी आमची स्थिति झाली. पुनः घर सोडून चाकरीवर येण्याला नको. हे राजाश्री स्वतः अपराध करून दुसऱ्यास फांशी देणारे; यांचा आतां सहवास नको. (हिरजीस गाडून निघून जातात व आपण पुन्हा गच्चीवर जातो.)

रास०– संभ्या.

संभ्या– जी सरकार, (रक्त पाहून) महाराज, हें काय ! आपल्या आंगावर रक्त कोणाचें !

रास०– रक्त कोणाचें ! सांगतों देस खा? (तरवार उपसून त्यावर धांवतो तो लेथून निसटून जातो.)

रास०– (सर्व गेले असें पाहून) हें पत्र, माझ्या वयाचा, रूपाचा व गुणाचा मित्र सत्यसेन बाहादूर प्रधानपुत्र यांस दिल्यानें तो माझे उपकार स्मरून जें काम सांगेन तें तो सहज करील, तर त्याजकडे जावें. (जाऊं लागतो व पुन्हा वस्त्राकडे पाहून) मला खून चढला ह्मणून वस्त्रांनाहीं; खून चढला. अरे

वा: गुलामांनो, तुह्मांला येणें असेल तर उद्यां नेईन. आज कांहीं काम नाहीं तुमचें. (वस्त्रें काढून दुसरीं अंगांत घालून निघून जातो.)

---

## प्रवेश २ रा.

### (दिवाणखाना.)

प्रधान पुत्राची अभ्यासाची जागा.

सत्यसेन–प्रधानपुत्र–रासगुप्त–राजघराण्यांतील मुलगा.
गुण्या–प्रधान पुत्राचा चाकर.

सत्य०–(कांहीं पुस्तकें चाळवून) मला वाचण्याची अभिरूचि बरीच लागली आहे; परंतु मला याचा (पुस्तक घेऊन) कांहींच अर्थ समजत नाहीं असें कां होतें? (विचार करून) हो, जसा केशरी भात मिळाला ह्मणजे पुष्कळ खावासा वाटतो, तसा साधा भात खावासा वाटत नाहीं. तशींच हीं पुस्तकें पुष्कळ आहेत, परंतु त्यांतील बारा पुस्तकें शिवाय करून बाकींच्यांस मी हात सुद्धां लावीत नाहीं. ह्मणून मला तीं वाचावींशींही वाटत नाहींत. हींच जर एखाद्या भिकाऱ्या जवळ असतीं, तर त्यांनीं वाचून भूस पाडला असता. इतकेंही करून त्यांना आमच्या इतपत ज्ञान तरी आलें असतें काय? उगीच बेठे आपलें आयुष्य पुस्तकें आणि कागद्रांचीं चिटोरें वाचण्यांत घालवितात! कोणी अघटित कर्तृत्व करून आपलें शूरत्व दाखवीत नाहींत. माझा मीच विचार करतों कीं, न्यायशास्त्र शिकविण्यास बाबांनीं गुरूजींस सांगितलें, त्यामुळें मी तें मुखोद्गत् करून गुरूजवळ ह्मणूं लागलों ह्मणजे विस्मरण होतें व येत नाहीं. ह्मणून निश्चय केला कीं, वाचून अथवा शिकल्यानें आपणास

ज्ञान येईल; नाहीं तर येणार नाहीं. ही खोटी समजूत आहे. जसे आपण लहानाचे थोर झालों, पैसा उडविण्यास, छानछोकी करण्यास आणि मनाप्रमाणें वागण्यास आपणास समजूं लागलें ह्मणजे लोक शहाणे ह्मणतात. तर हें शहाणपण आह्मांला आलेंच; परंतु लोक आह्मांस शहाणे ह्मणण्यास बाबांचा अधिकार मिळाला पाहिजे आणि संसाराकरितां एक फक्कडशी शारंगप्रभेसारखी बायको; मग माझा काय थाट ? मी राजाचा जावई! मला शहरांतील लोक मुजरे करतील आणि माझी थोरवी मानितील. मग कांहीं दिवसांनीं मला राज्य मिळाल्यावर मला गर्वांत रहाणें भाग पडेल. तोंवेळपर्यंत जर गुरु वाचले, तर खचितच त्यांस विचारल्यावांचून राहणार नाहीं कीं, कोण राजा झाला ! मी कीं धनपाळ. (आरशांत रूप पाहून) काय फक्कड दिसतो आजचा मंदील! खुबच आईटबाज बांधला आहे! एक शिरपेंच, कलगी व तुरा जर रोज बांधला, तर खर्च काय येईल ? तो निदान महाराजांच्या शिरपेंचाहून साधारण मोठा असून झक्क असला पाहिजे. मग जर मला कोणी पाहिलें, तर ओळखणार नाहीं कीं, मी कोण आहें? (इतक्यांत गुण्या प्रवेश करितो).

गुण्या०—(आपल्या धन्याकडे पाहून मनाशींच) आमचे अन्नदाते गुणी खचीत; परंतु ग्रहयोगानें ग्रासले. पोशाखाची थोरवी आणि स्वसौंदर्यवर्णनांत आपल्या आयुष्याचा व्यय, या वांचून दुसरें कांहीं प्रिय नाहीं. त्यांचा प्रियमित्र रासगुप्त बाहेर उभा आहे, ती वर्दी यांस देतों. (जवळ जाऊन) आपल्या प्रियमित्रास येण्यास मोकळीक असावी ?

सत्य०—कोण आलें आहे रे ?

गुण्या०—महाराज, आपले परमस्नेही रासगुप्त महाराज.

सत्य०—जा, जा, त्यांस लवकर घेऊन ये. (जाऊन रासगुप्तासह प्रवेश करतो. त्यास पाहून) या. राजे असे असे इकडे या. बसा. (जवळ बसवीत असतां).

रास०—ठीक आहे रे बुवा.

सत्य०—मित्रा, आजचा शोक, रोख, कांहीं निराळाच दिसतो.

रास०—यांत मुळींच संशय नाहीं. कारण कीं, मी जेव्हां तेव्हां सांगत असें कीं, काम काम ह्मणजे हातचा मळ. तशींच आजची गोष्ट झाली.

सत्य०—ती कशी काय बरें?

रास०—मित्रा, सत्यसेना तुझ्याकरितां माझा जीव खर्च करण्यांस तयार आहें; मग हिरजीची माझ्यापुढें काय कथा? मी स्वत: बाहादरानें त्यास ठार मारून पुरून टाकला आणि तुझ्या भेटीस आलों.

सत्य०—काय? तूं त्या हिरजीस ठार केलास?

रास०—हो. हो. हिरजीस ठार मारला समजलास!

सत्य०—अरेत्या गरीबास ठार मारून तुला त्यांत काय मिळालें?

रास०—मित्रा काय मिळालें ह्मणून विचारतोस हें पहा. (शारंगप्रभेचें पत्र दाखवितो.)

सत्य०—अरे कोणी ऐकेल. मोठ्यानें बोलूं तरी नकोस?

रास०—कां बरें, मला कोणाचें भय नाहीं; मी राजा. मला वाटेल तसें वागण्यांस कोण प्रतिबंध करणार?

सत्य०—मित्रा, इतका उतावीळ कां होतोस? युक्तिप्रयुक्तीनें आपणांस अधिकार मिळूं दे; नंतर पहातां येईल. (पत्र वाचून) रासगुप्ता, हें पत्र मोठेंच गम्मतीचें आहे. आज माझा मनोदय सिद्धीस जाण्यांस तूं मजवर महत उपकार

केलेस. हे उपकार यावत् जन्म विसरणार नाहीं. आतां तुला माझें सांगणें इतकेंच कीं, आज रात्रीं पत्राप्रमाणें शारंगप्रभेसह अन्यराज्यांत जाऊन विलास करून देहाचें सार्थक करीन. तुला राज्य मिळेपर्यंत तूं येथें राहून सुख भोग. ज्यावेळेस तुझी इच्छा मला पाहाण्याची होईल त्यावेळेस चार ओळी मला लिहिल्यास मी एकदम येऊन हजर होईन.

रास०—वाः मित्रा वाः! तूं तर रहाणार होतास आणि आतां जाण्याचा विचार केलास हें काय?

सत्य०—बाबा तशीच गोष्ट आहे ह्मणूनच गेलें पाहिजे.

रास०—जा, पण संभाळ बरें? कारण कीं, ती बोलण्यांत मोठीच धूर्त आहे.

सत्य०—आतां ती काळजी तुला नको मला सर्व समजतें.

रास०—बरें तर मी आतां जाऊं! (जातो.)

सत्य०—जा. तुझी माझी हीच भेट आतां. (विचार करून मनाशींच पत्र पाहून) हा खराच शूर आहे. कारण कीं, माझ्या कामा आड येणारा हिरजी जगांतून नाहींसा करून कृष्णानें अर्जुनास सुभद्रा दिली, तशी सर्व गुणसंपन्न शारंगप्रभा मला दिली. आतां माझ्या सारखा या जगांत दुसरा कोण आहे? अरे पण मी व्यर्थ वेळ कां घालवितों? सायंकाळ झाला. आज बाबानीं हिमतरामाकडे सरकार स्वारीबरोबर जाण्यांस पोशाखानीशीं तयार रहाण्यास सांगितलें असून मी तयारीही केली नाहीं. (पत्र पाहून) आणि या पत्रांतही आजचाच संकेत आहे. आतां काय करावें? (विचार करतो) कांहीं असो. आजचा संकेत सिद्धीस

नेणार. परंतु धनपाळच्या पोशाखासारखा पोशाक पाहिजे. तो मिळणार कसा? ( मनन करून ) अरे बरेंच स्मरण झालें. ओळखीचा जव्हेरी बाजारांत केवळराम आहे. त्याजकडून आणवूं. कोण आहेरे बाहेर?

गुण्या०—जी माहराज, काय आज्ञा आहे.

सत्य०—अरे आपल्याकडे तो केवळ राम येतो ना?

गुण्या०—होय महाराज.

सत्य०—त्याजकडे जाऊन माझ्या नांवानें त्याचा पोशाक मागून आण.

गुण्या०—महाराज सावकाराच्या पोशाखाची काय गरज विचारल्यास, सेवकानीं काय सांगावें?

सत्य०—तूं तरी मोठा विलक्षण मनुष्य आहेस, सांगितल्याप्रमाणें पोशाक माग आणि जर विचारलेंच तर सांग कीं, सत्यसेनास स्वतःकरितां पाहिजे. उद्यां परत पाठवूं.

गुण्या०—ठीक आहे महाराज. ( निघून जातो )

सत्य०—( मनाशींच ) आज मनोरथ पूर्ण होणार. आतां मला कांहीं दागदागीने, पोशाक, वगैरे बरेच बरोबर घेतले पाहिजेत. मग मला कोण ओळखतो कीं, मी प्रधान पुत्र आहे कीं, राजपुत्र आहे? आणि त्यांतून शारंगप्रभेसारखें अमोल्य रत्न ( छातीस हात लाऊन ) ह्या सावकाराजवळ राहणार! मग! द्रव्याला, व ऐश्वर्याला काय कमी आहे?

---

## प्रवेश ३ रा.

( शारंगप्रभेची माडी )

सत्यसेन (प्रधान पुत्र, कपटी धनपाळ,) शारंगप्रभा–
( राजकन्या, ) गंगु ( दासी. )

शारंग०–( मनाशीं ) गंगुही गेली. दिवे लावण्याची वेळ झाली. अद्यापि हिरजीचें ठिकाण नाहीं. आतां काय करूं बाई ! हें ( पत्र कांतीवर्म्यास लिहिलेलें) बाबाला देण्यासाठीं लिहिलें. जर गंगुजवळ देईन, तर तिला समजून ती माझ्या टपणीस बसेल, अथवा कोणाजवळ बोलेल. काय करावें ? हो, बरीच आठवण झाली. ( आरशाकडे पाहून ) ह्याच्याच पाठीमागं ठेवावें ( नजरेस पडण्यासारखें आरशाच्या चौकटीस खोवून ) ठीक आहे. ( संशयी होऊन पुन्हा हातीं घेऊन ) एकवेळ वाचावें. ( वाचूं लागते ) ॥ श्री ॥ श्रीमंत सकल गुणालंकरण अखंडीत लक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री, तिर्थरूप, बाबासाहेब यांस–वडिलांचे सेवेशीं. आपत्य बालकानें दोन्हीं कर जोडून शिरसाष्टांग दंडवत, विनंती करितें ऐसीजे जन्मापासून सर्व सुख भोगून, अंतीं दुःख देण्यास कारण झाल्यें, या अपराधाची क्षमा होण्यास सबळ कारणें आहेत. त्यांचा विस्तार होईल ह्मणून थोडक्यांत लिहिण्याच्या विचारावरून खात्री न झाल्यास उपाय नाहीं, असें जाणून लिहितें कीं, आमच्या दादाची व माझी वागणूक आपण जाणतांच. परंतु आतां मी अल्लड नाहीं असें वाटल्यावरून त्यानें सत्यसेनास (प्रधान पुत्रास) वरण्यास सांगितलें; ती गोष्ट न आवडल्यामुळें मजवर बंधुवर्गाप्रमाणं प्रिति करणाऱ्या सावकारपुत्र धनपालाचे नांव घेऊन त्याच्या नादीं लागली

आहेस वगैरे बोलून आपणांस सांगण्याची प्रतिज्ञा करून दुःख देण्याचा निश्चय केला; त्यामुळें "मनुष्य काय न करील" तर हा कोणत्या वेळेस मजवरील माया कमी करून दुःख देईल याचा नेम लागणार नाहीं, ह्मणून अल्पमतीनें धनपाळास चार ओळी लिहून आज रात्रीं बोलाविलं आहे; तो आल्यास प्रवासांत माझें रक्षण करण्यास उपयोगी पडेल. आपण कोणाच्याही बोलण्यावर विश्वास न देतां मनास विवेक करावा इतकीच विनंती करितें.

आपली आज्ञाधारक कन्या
शारंगप्रभा.

(बंद करून भारशाच्या चौकटींत खोंऊन ठेवते)

माझी तर तयारी आहे, पण धनपाळ येणार किंवा नाहीं, तें कांहींच समजलं नाहीं. हिरजी गेला तो गेलाच; काय बाई तऱ्हा ही! हो, असेंही खरं कीं, धनपाळानं रात्रीं राजवाड्यांत पत्ता दाखविण्याला ठेवला असेल. आतां किती वेळ राहिला? घटकेनं समजेलच (स्वस्थ बसते)

क० ध०–(मनाशीं पोशाखाकडे पाहून) आतां कांहीं काळजी नाहीं. हिंमतरामाकडे जाण्याच्या निमीत्त्यानीं तरी दागीनें हातीं लागले. असा योग कधींच आला नसता. पोशाखानें मला तर फारच शोभा आणली आहे. आतां धनपाळासारखें मला चाललें पाहिजे, ह्मणजे धनपाळांत आणि माझ्यांत कांहींच अंतर नाहीं; असें वाटून ज्या पायांनीं मी चालतों, त्याचा उद्धार शारंगप्रभेचे गोंडस आणि नाजूक हात करतील. अशा समयीं तिच्या हातातील दैदिप्यमान कंकणें आपल्या नादानें माझ्या आल्हादास कारण होतील. तिची रमणीय आणि आनंदमय मुद्रा माझ्या अं

तःकरणांत आनंदाच्या लहरी आणिल; आणि देवादिकांस अलभ्य जें सुख, त्याचा हा बाहादर अनुभव घेणार ! धन्य धन्य धन्य मी ! राजघराण्यांतील मुलगी बायको मिळाल्यास आणखी काय पाहिजे! अरे मी मनोराज्य कां करतों ? मी वाटेनेंच आलों ना? [इकडे तिकडे पाहून] ही हीच वाट मागल्याबाजूस जाते. घोडाही फार लांब बांधून आलों. तेथून कोणी सोडून नेल्यास आपला सर्व बेत व्यर्थ जाणार. पण छीः, रात्रीं कोण घोड्यास सोडून नेतो. अरे [खिडक्याकडे पाहातो. ]

शारं०–( कपटी धनपाळास पाहून )अग बाई, वेळ तर बराच झाला. तो कोण बरं येत आहे? हो धनपाळच. पोशाख तर तसाच दिसतो. बरं, इतका लांबून कां पाहातो ? (खिडकीची एक फळी साफ उघडते ) येईल, पण तो हिरजी कुठे दिसत नाहीं. त्या बिचाऱ्याला शेला पागोटं देईन ह्मणून बोललें; पण त्याचा ठिकाण नाहीं. आतां काय करूं! देवडीवर जातानां तें टाकावं ह्मणजे सकाळीं त्यास मिळेल. ( शेला पागोटें हातांत घेऊन ) ( पुन्हाः खिडकींत जाऊन. ) आलें. ( कपटी धनपाळ, हू हू करतो त्यास वरून एक गठडी देते व शेला पागोटें घेऊन वाड्यांत येते, त्यास झाडा खालीं उभा पाहून ) धनपाळा, या देवडीवरून हें शेला पागोटं हिरजीस देऊन निघून जाऊं चल. (तो हातानें खुण करीत घोड्याजवळ आणून उभयतां स्वार होतात.)

---

## अंक ३ रा.

---

### प्रवेश १ ला.

( सावकाराचा वाडा )

हिंमतराम सावकार–धनपाळ सावकार पुत्र, कांतिवर्मा-

राजा, रासगुप्त, (राजघराण्यांतील मुलगा) प्रधान, सेनापती, सरदार, न्यायाधिश, सावकार, नगरवासी जन वगैरे मंडळी.
(कलावंतिणींचें नृत्य गायन चाललें आहे, इतक्यांत एक मुनिम धनपाळास उत्तम वस्त्रालंकारांनीं सजवून घेऊन येतो. प्रधान सामोरा जाऊन त्याच्या उजव्या हातास धरून कोतीवर्म्याशीं नेतो. तो मुजरे करूं लागताच सर्व उठून त्यास मान देतात तो सर्वांस मुजरे करून राजाच्या उजव्या बाजूस बसतो.)

हिंमत०—(उठून सर्वांपुढें हात जोडून) आज अन्नदात्याच्या पूर्ण कृपेनें निमंत्रणास मान देऊन नागरिकजन, मुत्सद्दी, सरदार, मानकरी आणि आप्तवर्ग यांहीं सभास्थान सुशोभित केल्यामुळें मला जो अत्यानंद झाला, तो वर्णन करण्यांस मी असमर्थ आहे. आज सर्वांस तसदी देण्याचें कारण, माझ्या धनपाळाचा वाढ दिवस ह्मणून सभाजन मला क्षमा करतील अशी आशा आहे. (नेत्रसंकेतानें कारकुनास अत्तर, हार, तुरे, देण्यास सांगतो, कारकून ते देतो, राजा, प्रधान वगैरे विडे अत्तर घेऊन उठून जातात इतक्यांत भद्रावतीहून रामचंद्र कारकून प्रवेश करतो.)

राम०—(एका खांबावर गठलें, हातांत लांब काठी, पागोट्यास उपर्णे बांधून कास घातलेला वाड्याकडे पाहून) हाच शेटजीचा वाडा, आज काय बरें आहे? थाट तर मोठाच दिसतो. (विचार करून) अशा वेळीं सांगणें ह्मणजे दुधांत विषबिंदू सारखें होणार. बरें न सांगावें तर आज चार रोज पेढी बंद राहिल्यामुळें एक तर नुकसानी, दुसरा लौकीक नाहींसा होतो. यापेक्षां मनांत कांहीं अंदेशा न आणतां जाऊं. न सांगावें यासारखें सुख नाहीं (वर जातो त्यांस पाहून).

हिंमत०—(विस्मयानें) कां पंत, केव्हां आलांत?

राम०—हा, आतांच आलों?

हिंम०—मध्येंच येण्याचें आज कांहीं कारण नसतां, येण्याचें कारण सांगण्यास भितां कां? बोला, कीं मी एकिकडे येऊं?

*राम०*–शेटजी, आजच्या गोष्टीवरून जो सर्वांस आनंद झाला; तो नष्ट होईल ह्मणून शेटजीनीं ह्या वेळीं ऐकण्याचा दुराग्रह धरूं नये अशी विनंती आहे. उदईक समजेल आपणास.

*हिंम०*–रामचंद्रपंत, सुख दुःखें हीं आपणासच हें सर्व जाणतात, सुखाची रात्र बरीच गेली, आतां दुःख भोगणें असल्यास तुमचा मुळीच उपाय नाहीं. सकाळीं दुःख सहन होईल आणि आतां सहन होणार नाहीं ही आपली वेडी समजूत आहे. सांगाच काय आहे तें!

*राम०*–शेटजी, भद्रावतीची पेढी बंद झाली, ह्मणून येथें आलों.

*हिंम०*–कां बरें? असें काय झालें! आजच माझें नांव जगांतून नाहींसें झालें! अहो नफा तोटा याचा हिशेब न देतां अशी गोष्ट कशी केली बरें! त्या आमच्या ह्मातान्या मुनिमाची अक्कल कशी चकली?

*राम०*–तेच चकले, मग अक्कल कां चकणार नाहीं?

*हिंम०*–या अशा बोलण्यानें माझ्या मनाची समजूत होत नाहीं. काय असेल तें स्पष्ट बोला. भिऊं नका.

*राम०*–शेटजींच्या आश्रयावर जे आपले वृद्ध आबाजीपंत मुनीम होते, त्यांस दर्शनीं बोलावणें आल्यावरून ते कोणासही न सांगतां जग सोडून परलोकवासी झाले!

*हिंम०*–(सुस्कारा टाकून) धनपाळा, लोक तर गेलेच, परंतु ही (मंडळीस दाखवितो) मंडळी बसली आहे, तिचा हुकूम घेऊन गाणारणीस रजा द्या!

*धन०*–(बापाच्या सांगण्यावरून गाणारणीस) तुह्मी आपलें गाणें बंद करा. (हात जोडून लोकांस) आज जो आनंद झा-

ला होता; तो नाहींसा होऊन आह्मांवर दुःखाचा डोंगर कोसळला!. हें नाटणें स्वभाविक मनुष्याच्या वागणुकीवर आहे, आणि आंज जो जनसमूह जमला आहे, यांस आमच्या भद्रावतीच्या मुख्य पेढीविषयीं माहिती असेलच, आणि त्याच पेढीच्या जोरावर इतर राज्यांत पेढ्या घातल्या. तेथील आमचे विश्वासू मुनीम आबाजीपंत यांस चार दिवसांवर देवाज्ञा झाल्याची अत्यंत दुःखकारक बातमी रामचंद्रपंतानीं आतांच कळविली. त्यामुळें आनंदकारक चिन्हें बंद करण्यांस सभाजनाजवळ प्रार्थना करितों. (इतकें ऐकल्यावर बसलेली मंडळी व गाणारीण निघून जातात.)

हिंमत०—(मनाशींच) हर हर! मी काय विचार करीत होतों आणि झालं काय? (धनपाळाकडे पाहून रामचंद्रपंतास) पंत, जेव्हां जेव्हां मुनीम यात्रेस जाण्याचें निमित्य सांगत, त्यावेळेस त्यांस माझें सांगणें होतें कीं, आतां आपला धनपाळ जाणता झाला, त्यालाच सर्व सोपून आपण उभयतां काशीयात्रेस जाऊं. आपण उभयतां समवयस्क असल्यामुळें प्रवासांत सुख होईल; परंतु त्यांस यात्रा झाली नाहीं. त्यांनीं मजकडे मुनिमाचें काम ४५--४६ वर्षें केलें, ह्मणून कुठे एक पैची अफरातफर केलेली माझ्या आढळण्यांत आली नाहीं. दुसऱ्याची पेढी आणि मी नौकर असा भाग त्यानीं कधींच दर्शविला नाहीं. उलटें मला जर कांहीं व्यवहारसंबंधीं विचार घेणें झाला, तर मला त्याचा विचार फारच पसंत पडे. धन्य तो प्राणी! देवा एक रत्नच नेलेंस! तुझी इच्छा.— (डोळ्यांत आश्रु येतात, तें पुसूं लागतो.)

राम०—शेटजी ईश्वरसत्तेपुढें उपाय नाहीं. “आलीया-

भोगासीं असावें सादर " या वाक्याप्रमाणें अपायाला उपाय योजिला पाहिजे.

हिंम०–पंत, योजायचा तो कोण ? सुदैव गुरू आप ज्या शिष्याचें वर्णन करतात, त्यावरून मला भूषण आहे हें सांगवत नाहीं. आतां अनयासें ही परिक्षाच पाहाण्याची वेळ आणली आहे. (धनपाळास) धनपाळा, इकडे ये असा. (तो मोठ्या लीनतेनें हिंमतरामाजवळ येऊन बसतो) बाळा, (पाठीवर हात ठेऊन) आज दिवसपर्यंत तुला मी दूर केलें नाहीं, आणि आतां स्वखुशीनें दूर करणार. वृद्धावस्थेंत अंतकाळीं पाणी देण्यास पुत्र पाहिजे; परंतु जगांत द्रव्याला मान विशेष आहे ह्मणून माझे सर्व विचार एकीकडे ठेऊन, तुझें हित पाहिलें पाहिजे, ह्मणून निरुपायामुळें सांगणें भाग पडतें कीं, तुझें हित अनहित तुला जाणलें पाहिजे. ईश्वरदयेनें तुझ्यावर छत्र आहे तोंच स्वतः तुझी बढती करून घेण्याची शैली पाहून स्वर्गी सुखही मला विशेष वाटणार नाहीं; तर स्वपराक्रमानें पुरुषार्थ करून पूर्वजांचा व स्वतःच्या नांवाचा लौकिक कर. तूं शाहणा आहेस. तुला विशेष काय सांगू. जगांत पुत्राचे वियोग दुःख दुःसह आहे, याचा अनुभव ज्या मनुष्यास असेल तोच सांगेल (धनपाळास स्तब्ध पाहून)

राम०– कां शेटजी निमूट बसलांत.

धन०–वडीलांची आज्ञा शिरसामान्य ह्मणून.

राम०–(हांसून) शेटजी, तिथें जाऊन, ऐषआराम भोगायचें नाहींत. मांडीवर मांडी घालून हुंड्या, व्याज व नफातोटा पाहावा लागणार.

धन०–(नम्रतेनें) आपण जाणते आहांच. जर कांहीं

माहीती लागली, तर आपण सांगाल. गुरुजीनें शिक्षण देतेसमयीं उपदेशच केला होता कीं, तुला मरेपर्यंत हा सहवास पडणार म्हणून नीट लक्षांत ठेव. तर तें मी कसा विसरेन !

राम०—(हिमतरामास) मग धाकट्या शेटजीस केव्हा, चा हुकूम होतो !

हिंम०—केव्हांचा काय ? कां धनपाळा उद्यांचा बेत तुझ्या पसंतीस येतो का ?

धन०—(हात जोडून) मी पूर्वीच सांगितलें कीं, आपल्या आज्ञेविरुद्ध वागणारा नाहीं. आतां जरी आज्ञा झाली तरी मजकडून तयारी आहेच.

हिंम०—कां पंत, ऐकलेंतना उत्तर? (तो हासतो) तर आतां तुम्ही उद्यीक छकडा तयार करून धनपाळास सांभाळून न्या, फलाहाराची वगैरे सोई करवा म्हणजे झालें. (सर्व जातात)

---

## प्रवेश २ रा.

(सावकार पुत्राची निजण्याची जागा.)

धनपाळ–(सावकारपुत्र,) तुळाजी–(त्याचा गडी.)

धनपाळ–(महालांत छातीवर पुस्तक ठेऊन मंचकावर निजल्या-निजल्या) झोंप कांहीं येत नाहीं ! बरें पुस्तक वांचू लागलों, तर मन बसत नाहीं. इतका मी आळशी झालों ! लोकांस मी उपदेश करतों आणि आज सायंकाळपासून आतां बारा घटका रात्र झाली, इतका वेळ व्यर्थ गेला. माझी पुस्तकांचीं गांठ पडली नाहीं आणि उद्यां तर मी जाणार. परंतु तेथें माझ्या मनाला करमणूक करणारी, स्वदेशहितास आणि

वर्गबंधूंस सुख होणाऱ्या आनंदकारक गोष्टींचीं पुस्तकें जीं असतील, तींही बरोबर घेतलीं पाहिजेत. मासिक पुस्तकें जनहितास झटणारीं निघतात, त्यांपैकीं एखादें तिथे मागवूं आणि एक दोन प्रसिद्ध वर्तमानपत्रें, म्हणजे मग मात्र मला करमणूक होईल. (विचार करून कांहीं वेळानें.) अरे मना, का तूं व्यर्थ इच्छा करतेस. तिची मर्यादशील वागणूक, गंभीर बोलणें, तुला संतोषीत करतात. परंतु देव्हाऱ्यांत देवांची सर्व जन पूजा करितात, आणि एखाद्या देवतेची पूजा जशी मनसुप्रसन्न करिते, तद्वत सहस्त्रावधी स्त्रिया तूं पाहिल्यास; परंतु शारंगप्रभेपुढें तुच्छ आहेतसें वाटतेंना? अनेक पुस्तकांत कवींनीं स्त्रीपुरुषांचीं रूपें, गुण आणि अवयव इत्यादिकांस मनांतील पूज्य वस्तूंच्या उपमा देऊन आपल्या अंतःकरणाच्या समजुती केल्या; परंतु राजकन्येच्या वर्णनास जे शब्द आहेत, त्यांची तुलना करूं गेल्यास गुण ग्राह्य करून दोष मागें ठेवावे लागतात. तर अशा सुस्त्रियेला उपमा देऊन दोष लपविण्यापेक्षां इच्या स्वरूपाबद्दल ईश्वराच्या अघटीत कर्तृत्वाविषयीं त्याची स्तुती करणें, योग्य आहे. हे अनंत कोटी ब्रह्मांडनायक, हे अगम अगोचर! मी अज्ञ असून तुझें कर्तृत्व अगाध आहे. जगांतील स्थावर जंगमादिक वस्तू उत्पन्न व लय कर्ता तूंच आहेस. योगी, ज्ञाते, आणि विद्वान् जगाच्या राहटीवरून तुला जाणतात. परंतु तुला ओळखीत नाहींत. अस्तित्व दाखवून अलीप्त रहातोस, आणि सर्वसाक्षी आहेस. (पुन्हा मदनास) अरे निर्दया! कवीपेक्षां मी श्रेष्ठ नाहीं. मग मला अपाय करून तुला काय मिळणार? कवींनीं अनेक उपमा देऊन ते तुझ्या ऋणांतून मुक्त झाले; परंतु मी अल्प मती तुझा ऋ-

णकरी, या देहांत जीव असेंपर्यंत राहणार. तुझ्या ऋणा-
तून मी कसा मुक्त होईन! (उठून बसतो व विचार करून)
चित्त फारच उद्विग्न झालें! कांय करूं? (खालींवरील पुस्तक
काढून वाचून) माझ्या वडिलांनीं मजकरितां विद्या शिक-
विण्यास जे परिश्रम घेऊन शिक्षण दिलें, त्याचा व्यय ज-
गांत करण्यास मला मुळींच जागा नाहीं. काय अघटीत
बुद्धि याची! धन्य हा पुस्तककर्ता! याचे विचार आणि ज्ञान
वर्णनीय मला वाटतात! कारण कीं, माझ्या आल्पायुष्या-
पासून माझ्या मतीस जे तरंग येतात, त्यावरून जगनियं-
त्याच्या कर्तृत्वाविषयीं आणि सर्वज्ञतेविषयीं माहिती करितां
प्राणीमात्रांनीं आपलें आयुष्य कितीही खर्ची घातलें, तरी
त्याचा उलेख झालेला कोठेंच आढळत नाहीं, त्यावरून
ते आपणांस दूषण घेतात, मग मला द्रव्य अथवा विद्या सं-
पादन करणें व ऐषआराम भोगणें हीं कशाला पाहिजेत.
(इकडे तिकडे फिरून) सृष्टिक्रमाप्रमाणें जन्म आणि मृत्यु यांत
अंतर पडण्याकरितां दीक्षा घेऊन साधु झाले, तथापि त्यांस
षड्रिपुंपासून भय आहेच; कदाचित् तेही स्वाधीन केलें,
तरी त्यांस काळाचें भय आहेच. एकंदरीत हा घोटाळा
कांहीं विलक्षण वाटून चालू क्रमाकडे लक्ष दिलें, तर "जि-
तक्या व्यक्ती तितक्या प्रकृति" या नियमाप्रमाणें माझे वि-
चार व तर्क मला भ्रमीत करतात. असें कां बरें होतें?
(मनाशींच) हो. साधु व ज्ञाते हें या आर्य महीस भूषण देतात.
तेंही यथायोग्य वाटण्यास पुष्कळ सबळ कारणें आहेत;
त्यावरून अस्तित्व जाणून आपल्या जीवितास किती जप
तात? देव, यक्ष, गण, गंधर्व, किन्नर, पशूपक्षादिक नियमीत
गोष्टी आचारतात; परंतु त्यांचे प्रत्येकांचे नियम व व्यवसाय